# आनंदी राजपुत्र

ऑस्कर वाइल्ड



त्या उंच स्तंभावर उभा असलेला आनंदी राजपुत्राचा पुतळा शहराचे गौरवचिन्ह होते. पण खाली जमिनीवर दिसणारे अतीव दु:ख पाहून राजपुत्राच्या निळ्याशार डोळ्यात मात्र अश्रू तरळत असत. राजपुत्राचा पुतळा मौल्यवान सोने, रत्न व खड्यांनी जडवलेला असूनही अचल असल्यामुळे गरीबांचे दु:ख कमी करू शकत नव्हता. पण तेव्हाच एक पाकोळी पक्षी राजपुत्राच्या पायाजवळ येऊन थांबतो. राजपुत्र पक्ष्याला आपला संदेशवाहक बनण्यासाठी त्याचे मन वळवतो. आपल्या पुतळ्याच्या अंगावरील एकएक सोन्याचे पान, रत्न व खडा तो पक्ष्यामार्फत गरीबांना पाठवतो. थंडीच्या दिवसांत पक्ष्याला उबदार देशात जावेसे वाटते. पण जर्जर झालेल्या राजपुत्राच्या प्रेमात अडकलेला पक्षी परिणामांचा विचार न करता राजपुत्राजवळच राहातो. हळूहळू पक्षी त्याला सांगितलेली सर्व कामे करतो. शेवटी दोघांकडेही देण्यासाठी काही उरत नाही.

ऑस्कर वाइल्डची ही अभिजात परीकथा करुणा आणि नि:स्वार्थ यांचे सुरेख मिश्रण आहे. रॉबिनच्या सुदर चित्रांनी त्याला नवे चैतन्य मिळवून दिले आहे.

# आनंदी राजपुत्र

## ऑस्कर वाइल्ड



शहराच्या उंच भागात एका उंच स्तंभावर आनंदी राजपुत्राचा पुतळा उभा होता. पुतळ्याला सर्व बाजुंनी सोन्याची पातळ पाने जडवलेली होती. डोळ्यांच्या जागी दोन तेजस्वी मौल्यवान निळे नीलम खडे बसवले होते. त्याच्या हातातील तलवारीच्या मुठीवर मोठे लाल माणिक चमकत होते.

लोक या पुतळ्याचे कौतुक करत होते. "पवनकुक्कुटाइतकाच सुंदर दिसतोय पुतळा," नगरपरिषदेचा एक सदस्य म्हणाला. खोट्या प्रतिष्ठेसाठी तो आपली कलात्मक दृष्टी मिरवत होता. पण लोकांनी आपल्याला अव्यवहारी समजू नये म्हणून तो पुढे म्हणाला, "पण या पुतळ्याचा तसा काही उपयोग नाही."

"तू या आनंदी राजपुत्रासारखं का बनत नाहीस?" एक आई आपल्या छोट्याशा मुलाला समजावत होती. त्या मुलाने आभाळातील चंद्राचा हट्ट धरला होता.

"आनंदी राजपुत्र कधी कुठल्या गोष्टीसाठी रडला नाही," आई म्हणाली.



"एका गोष्टीचं मला बरं वाटतंय की जगात कुणीतरी खूप आनंदी आहे," एक निराश मनुष्य त्या अद्भुत पुतळ्याकडे पाहून पुटपुटला.

"तो अगदी देवदूतासारखा दिसतोय," एका धर्मादायी संस्थेची मुले म्हणाली. ते नुकतेच चर्चमधून बाहेर पडले होते. त्या सर्वांनी अंगात गडद केशरी झगा व त्यावर पांढरा स्वच्छ बिनबाह्यांचा सदरा घातला होता.

"तुम्हाला कसं माहित?" एका गणित तज्ज्ञाने शंका काढली, "तुम्ही देवदूत पाहिलाय का?"

"हो तर! आम्ही स्वप्नात पाहिलंय त्याला," मुले उत्तरली. गणित तज्ज्ञाच्या कपाळावर आठ्या पडल्या व तो गंभीर झाला. मुलांनी स्वप्ने बघणे त्याला पसंत नव्हते.

एके रात्री शहरावर एक पाकोळी पक्षी उडत आला. त्याचे मित्र सहा आठवड्यांपूर्वीच इजिप्तला गेले होते. पण तो एकटा मागे राहिला. कारण तो एका सुंदर लव्हाळी (एक गवत) च्या प्रेमात पडला होता. वसंत ऋतूत एका पतंगाचा पाठलाग करत असताना त्याला नदीकिनाऱ्यावरील लव्हाळी दिसली होती. लव्हाळीची सडपातळ कंबर पाहून पाकोळी तिच्याकडे आकर्षित झाला आणि तिच्याशी बोलायला थांबला.

"मी तुझ्यावर प्रेम करू शकतो का?" पाकोळी म्हणाला. त्याला एकदम मुद्द्यावर येण्याची सवय होती. हे ऐकून लव्हाळीने आपली कंबर झुकवली. मग पाकोळीने गोल-गोल उडत आपल्या पंखांनी पाण्याला स्पर्श केला व चमचमणारे तरंग उत्पन्न केले. हे त्याचे प्रियाराधन उन्हाळाभर चालले.



"हा मूर्खपणा आहे," इतर पाकोळी म्हणाले, "लव्हाळीकडे संपत्ती नाही आणि तिचे खूप सारे नातेवाईक आहेत." खरंच, नदीचे पात्र लव्हाळ्यांनी भरले होते. शरद ऋतू आल्यावर सर्व पाकोळी पक्षी उडून गेले.

मित्र निघून गेल्यावर प्रियकर पाकोळीला एकटे वाटू लागले. त्याला आपल्या प्रेमाची चिंता वाटू लागली. "ती एक शब्दसुद्धा बोलत नाही," तो म्हणाला, "ती नखरेल तर नाही ना! ती नेहमी वाऱ्याशी प्रेमालाप करताना दिसते." आणि खरंच, जेव्हा कधी वारा वाहात असे, लव्हाळी त्यावर डौलाने झुलत असे.

"मला वाटतं ती कुटुंबवत्सल आहे," असा विचार करून पाकोळीने आपले प्रयत्न सुरू ठेवले. "पण मला प्रवास करायला आवडतं. माझ्या पत्नीलाही प्रवास करायला आवडायला हवं."

"तू माझ्यासोबत येशील?" सरतेशेवटी तो लव्हाळीला म्हणाला. लव्हाळीने नकारार्थी मान हलवली. तिला आपल्या घराची खूप ओढ होती.

"म्हणजे तू माझ्या भावनांशी खेळतेयस तर!" पाकोळी बोलला, "आता मी पिरॅमिडच्या देशात जातो. अलविदा!" आणि पाकोळी उडून गेला

दिवसभर तो उडत होता. रात्री तो शहरात पोहोचला. "आता मी कुठे थांबू?" त्याला प्रश्न पडला, "मला वाटतं शहराने काहीतरी सोय नक्कीच केलेली असणार."

मग त्याने उंच स्तंभावर उभा असलेला पुतळा पाहिला. "ही जागा चांगली आहे. इथे भरपूर ताजी हवा आहे."



"इथे माझ्यासाठी सोन्याचा पलंग आहे," आजुबाजुला बघत तो पुटपुटला. तो झोपायची तयारी करू लागताच पाण्याचा एक मोठा थेंब त्याच्या अंगावर पडला. "हे काय! आभाळात ढग नाहीत, तारे स्पष्टपणे चमकताना दिसतायत आणि तरीही पाऊस पडतोय! उत्तर युरोपमधलं हवामान खरंच भयानक आहे. लव्हाळीला पाऊस आवडतो. पण त्यात तिचा स्वार्थ दडलाय."

पुन्हा एक थेंब खाली पडला.

"हा पुतळा पावसापासून माझा बचाव करणार नसेल तर याचा उपयोग काय? मला एखाद्या घराच्या चिमणीमध्ये आसरा शोधायला हवा," पाकोळी म्हणाला. तो उडून जाण्याच्या तयारीत असतानाच त्याच्या अंगावर तिसरा थेंब पडला. त्याने वर पाहिले. काय दिसले त्याला?

आनंदी राजपुत्राचे डोळे अश्रूंनी डबडबले होते. त्याच्या सोनेरी गालांवरून अश्रू ओघळत होते. चंद्रप्रकाशात राजपुत्राचा चेहरा खूप सुंदर दिसत होता. पाकोळीला त्याची दया आली.

"तू कोण आहेस?" पाकोळीने विचारले.

"मी आनंदी राजपुत्र आहे."

"मग रडतोयस का असा? तुझ्या अश्रूंनी मला भिजवून टाकलं" पाकोळी म्हणाली.

"मी जिवंत होतो तेव्हा माझ्याकडे मनुष्याचं हृदय होतं. तेव्हा अश्रू काय असतात याची मला कल्पनाही नव्हती. कारण मी चिंतामुक्त राजवाड्यात राहायचो. तिथे दुःखाला प्रवेश नसायचा.

दिवसा मी बागेत सवंगड्यांसोबत खेळायचो आणि संध्याकाळी मोठ्या सभागृहात नृत्य करायचो. बागेभोवती एक मजबूत भिंत होती. माझ्या आजुबाजुला एवढं सौंदर्य होतं की त्या भिंतीपलिकडचं जग कसं आहे, हेदेखील मी कधी कुणाला विचारलं नाही. दरबारी लोक मला आनंदी राजपुत्र म्हणत. मी असाच जगलो आणि एक दिवस मेलो. आता या लोकांनी मला एवढ्या उंचावर उभं केलंय की इथून मला शहराची सारी कुरुपता आणि दुःखं सहजपणे दिसतायत. माझं हृदय शीशाचं बनलंय. पण मी रडण्याव्यतिरिक्त काहीच करू शकत नाही."





"काय हा सोन्यापासून बनलेला नाही?" पाकोळी पुटपुटला. तो फार विनम्र होता आणि कुणावर व्यक्तिगत टीका करत नसे.

पुतळा मृदू आवाजात बोलू लागला, "इथून थोडं दूर एका गल्लीत एक गरीब घर आहे. त्याची एक खिडकी खुली आहे. त्यातून मला टेबलवर बसलेली बाई दिसतेय. तिचा चेहरा उदास आणि निस्तेज आहे. शिवणकाम करून ती घर चालवते. सुयांमुळे तिच्या हातांना भोकं पडलीयत आणि ते खडबडीत झालेयत. ती राणीच्या कपड्यांवर फुलांचा कशीदा करतेय. खोलीच्या कोपऱ्यात बिछान्यावर तिचा आजारी मुलगा आहे. त्याच्या अंगात ताप आहे आणि तो संत्र मागतोय. आईकडे त्याला द्यायला नदीच्या पाण्याशिवाय काही नाही. म्हणून तो मुलगा रडतोय. पाकोळी मित्रा, तू माझ्या तलवारीच्या मुठीतलं लाल माणिक काढून त्या गरीब बाईला देशील का? माझे पाय बांधले गेले आहेत. त्यामुळे मी हालचाल करू शकत नाही."

"मला इजिप्तला जायचंय," पाकोळी म्हणाला, "माझे मित्र नाईल नदीवरून उडतायत, नदीतल्या कमळ फुलांशी हितगुज करतायत. लवकरच ते झोपण्यासाठी महान राजाच्या कबरीत जातील. राजा स्वतः तिथे आपल्या शवपेटीत चिरनिद्रा घेतोय. त्याचं शरीर पिवळ्या तागामध्ये गुंडाळलंय. मसाला भरून ते टिकवून ठेवलंय. त्याच्या मानेवर गोल हिरव्या रंगाचे मौल्यवान खडे जडवलेली साखळी आहे आणि त्याचे हात सुकलेल्या पानांसारखे आहेत."



"पाकोळी मित्रा, तू एक रात्र थांबून माझा दूत बनू शकत नाहीस का? तो मुलगा तहानलेला आहे. त्याची आई दुःखी आहे," पुतळा कळवळून बोलला.

"मला मुलं आवडत नाहीत. मागल्या उन्हाळ्यात मी नदीकिनारी राहायचो. तेव्हा चक्कीच्या मालकाच्या दोन खोडकर मुलांनी माझ्यावर दगड फेकले. तसा एकही दगड मला लागला नाही कारण मी चपळ आहे. पण त्या मुलांनी दगड फेकून माझा अपमान केला," पाकोळी म्हणाला.

पण आनंदी राजपुत्राच्या चेहऱ्यावर पसरलेली उदासी पाहून पाकोळीला वाईट वाटले. "इथे खूप थंडी आहे. पण मी एक रात्र तुझ्यासोबत राहून तुझा दूत बनायला तयार आहे." पाकोळी बोलला.

"तुझे खूप खूप आभार," राजपुत्र म्हणाला.

मग पाकोळीने राजपुत्राच्या तलवारीतून लाल रंगाचे माणिक काढले आणि तो त्या गरीब बाईच्या घराकडे निघाला. तो चर्चच्या मनोऱ्यावरून उडाला. मनोऱ्यावर देवदूतांची शुभ्र पांढरी संगमरवरी शिल्पे कोरली होती.



पाकोळी राजवाड्यावरून उडू लागला तेव्हा त्याला खाली नृत्याचा आवाज ऐकू आला. एक सुंदर मुलगी तिच्या प्रियकरासोबत बाहेर सज्जात येऊन उभी राहिली.

"आज चांदणं किती छान पडलंय! प्रेमाची ताकद काही औरच असते नाही!" प्रियकर म्हणाला.

"नृत्य करण्याच्या वेळी माझा पोषाख तयार असेल अशी आशा करते. मी फुलांचा कशीदा करण्यासाठी माझा पोषाख एका बाईकडे दिलाय. पण या शिवणकाम करणाऱ्या बायका फारच आळशी असतात," मुलगी म्हणाली.

पाकोळी नदीवरून उडाला. नदीतील जहाजांच्या शिडांवर कंदील लटकत होते. शेवटी तो गरीब बाईच्या घरी पोहोचला. आत एक मुलगा पलंगावर तापाने फणफणत पडला होता. त्याच्या आईला झोप लागली होती. ती खूप थकली होती. पाकोळी टणटण उड्या मारत आत गेला आणि त्याने लाल माणिक बाईच्या शिवणकामाच्या टेबलवर ठेवले. मग त्याने आपल्या पंखांनी मुलाच्या कपाळाला वारा घातला. "किती छान वाटतंय! मी बरा होत चाललोय बहुधा," असे म्हणत मुलगा गाढ झोपी गेला.

मग पाकोळी आनंदी राजपुत्राकडे परतला. त्याने राजपुत्राला सर्व काही कथन केले.

"नवलच आहे! इथे खूप थंडी आहे. तरी मला खूप छान, उबदार वाटतंय," पाकोळी म्हणाला.

"कारण आज तू एक सत्कर्म केलंयस," राजपुत्र म्हणाला.

पाकोळी विचारात पडला. मग त्याला झोप लागली. विचार करताना त्याला नेहमी झोप येत असे. दिवस उजाडल्यावर तो नदीवर स्नान करायला गेला

"किती असामान्य घटना!" पाकोळीला नदीवर पाहून पक्षीशास्त्राचा एक प्राध्यापक आश्चर्याने म्हणाला, "थंडीच्या दिवसांत चक्क पाकोळी!" त्याने स्थानिक वृत्तपत्रांत याबाबत एक लेख लिहिला. त्यावर लोकांच्या चर्चा झाल्या. पण लेख एवढा क्लिष्ट होता की फार लोकांना तो समजला नाही.

"आज रात्री मी इजिप्तला जाईन," हा विचार करून पाकोळी खुश झाला. मग तो सार्वजनिक स्मारके बघत फिरला आणि चर्चच्या मनोऱ्यावर जाऊन बराच वेळ बसला. त्याला पाहून चिमण्यांनी चिवचिवाट केला आणि म्हणाल्या, "कोण हा अपरिचित?"

हे ऐकून पाकोळीला गंमत वाटली. चंद्र उगवल्यावर तो आनंदी राजपुत्राकडे परतला.

"इजिप्तमध्ये कुणाला काही संदेश पाठवायचाय? मी तिथे जाण्यासाठी निघतोय," पाकोळीने विचारले.

"पाकोळी, पाकोळी, तू आणखी एकच दिवस माझ्यासोबत राहू शकणार नाहीस का?"राजपुत्राने अजीजीने विचारले.

"मला इजिप्तला जायचंय. माझे मित्र एव्हाना सुदान देशात खळाळत वाहाणाऱ्या नाईलच्या धबधब्यावर पोहोचले असतील. तिथे पाणघोडे गवतात पहुडलेले असतात. तिथे ग्रॅनाइटच्या एका मोठ्या सिंहासनावर मेमनॉनं देवाचा पुतळा आहे. रात्रभर तो चांदण्या मोजत बसतो आणि सकाळ उजाडल्यावर आनंदाने एक आरोळी ठोकून पुन्हा शांत होतो. दुपारी पिवळे सिंह पाणी पिण्यासाठी नदीप्रवाहात उतरतात. त्यांचे डोळे हिरव्या पाचूंसारखे भासतात आणि त्यांची गर्जना धबधब्याच्या आवाजापेक्षाही मोठी आहे," पाकोळी म्हणाला.



"पाकोळी, पाकोळी," राजपुत्र म्हणाला, "मला शहरात एक तरूण त्याच्या छोट्याशा खोलीत खुर्चीवर बसलेला दिसतोय. त्याच्या टेबलवर कागद पसरलेयत. तो त्यावर झुकलाय. शेजारी एका भांड्यात सुकलेली जांभळी फुलं आहेत. तो एका नाटकाचं लिखाण करतोय. पण एवढ्या थंडीत त्याचे हात चालेनासे झालेयत. त्याच्या शेगडीत आग नाही. भुकेने तो अर्धमेला झालाय."

"मी आणखी एक रात्र तुझ्यासोबत थांबेन," सहृदयी पाकोळी म्हणाला, "मी त्या तरुणाला लाल माणिक देऊन येऊ का?"

"माझ्याकडे आणखी माणिक नाहीत. पण तू मौल्यवान नीलम रत्नाने बनलेला माझा एक डोळा काढून त्याला देऊन ये. हे रत्न हजारो वर्षांपूर्वी भारतातून आणले होते. तरूण हे रत्न विकून जळण खरेदी करेल आणि त्याचे नाटक लिहून पूर्ण करू शकेल," राजपुत्र म्हणाला.

"राजपुत्रा, मी तुझा डोळा काढू शकत नाही," रडवेला होत पाकोळी म्हणाला.

"पाकोळी, पाकोळी, माझी आज्ञा आहे तुला," राजपुत्र म्हणाला.

मग पाकोळीने राजपुत्राचा एक डोळा काढला आणि तो तरुणाच्या घराकडे उडाला. घराच्या छताला असलेल्या भोकातून तो सहज खोलीत शिरला. तरूण आपले डोके दोन्ही हातांमध्ये धरून बसला होता. त्याने पाकोळीच्या पंखांचा फडफडाट ऐकला नाही. काही वेळाने त्याने सुकलेल्या फुलांजवळ नीलम रत्न पाहिले.

"माझ्या कामाची कदर करणारं कुणीतरी आहे वाटतं. त्यानेच ही भेट मला पाठवली असावी. आता मी माझं नाटक लिहून पूर्ण करू शकतो," मग तरूण चिंतामुक्त दिसू लागला.

पुढच्या सकाळी पाकोळी बंदरावर गेला. तिथे एका मोठ्या जहाजाच्या शिडावर जाऊन बसला. खलाशी मोठमोठे पेटारे दोरखंडाने खेचून जहाजात चढवत होते आणि ओरडत होते, "हैशा! हैशा!" पाकोळी ओरडला, "मी इजिप्तला चाललोय!" पण त्याचा आवाज कुणीच ऐकला नाही. चंद्र उगवल्यावर पाकोळी आनंदी राजपुत्राकडे परतला.

"मी तुमचा निरोप घ्यायला आलोय," तो राजपुत्राला म्हणाला.

"पाकोळी, पाकोळी, आणखी फक्त एकच रात्र इथे थांब," राजपुत्राने विनवणी केली.

"हा थंडीचा मोसम आहे. लवकरच बर्फ पडायला सुरुवात होईल. यावेळी इजिप्तमधलं हवामान उबदार असतं. आळसावलेल्या मगरी छानपैकी चिखलात पडून राहातात. माझे मित्र बाल्बीच्या मंदिरात एक घरटं बांधतायत. पांढरी-गुलाबी कबुतरं त्यांना पाहातायत आणि कुजबुजतायत. राजपुत्रा तुला सोडून जायचं जीवावर येतंय. पण मी तुला कधीही विसरणार नाही. पुढच्या वसंत ऋतूत मी परतेन. सोबत तुझ्यासाठी लाल गुलाबापेक्षाही गर्द लाल असलेलं माणिक आणेन. सागराच्या निळाईइतकंच निळं असलेलं रत्न आणेन," पाकोळी म्हणाला.



आनंदी राजपुत्र म्हणाला, “खाली चौकात माचीस विकणारी एक लहान मुलगी उभी आहे. तिच्या सगळ्या माचीस नाल्यात पडल्यायत. ती घरी माचीसचे पैसे घेऊन गेली नाही तर तिचे वडील तिला मारणार. म्हणून ती रडतेय. तिच्याकडे चपला, मोजे नाहीत की डोके झाकायला कपडा नाही. पाकोळी, तू माझ्या दुसऱ्या डोळ्यातलं नीलम रत्न तिला देऊन ये. मग तिचे वडील तिला मारणार नाहीत.”

“मी तुमच्यासोबत एक रात्र थांबतो. पण मी तुमचा दुसरा डोळा काढू शकत नाही. तसं केलं तर तुम्ही आंधळे व्हाल,” पाकोळी म्हणाला.

“पाकोळी, पाकोळी, मी सांगितलंय तसंच कर,” राजपुत्राने आज्ञा केली.

शेवटी पाकोळीने राजपुत्राचा दुसरा डोळाही काढला. मग तो उडाला आणि नीलम रत्न त्या लहान मुलीच्या तळहातावर ठेवले. “किती छान रंगीत काच आहे!” मुलगी डोळे विस्फारत बोलली आणि हसतहसत घरी पळाली

पाकोळी राजपुत्राकडे परतला. “आता तुम्ही आंधळे झालात. म्हणून मी तुमच्यासोबतच राहायचं ठरवलंय.”

“नाही पाकोळी, आता तू इजिप्तला जाऊ शकतोस,” राजपुत्र म्हणाला.

“मी कायम तुमच्यासोबत राहाणार,” असे म्हणून तो राजपुत्राच्या पायाशी झोपला.

पुढच्या दिवशी पाकोळी राजपुत्राच्या खांद्यावर बसला आणि त्याने राजपुत्राला विविध देशांच्या गंमतीजमती सांगितल्या. त्याने नाईलच्या किनाऱ्यावरील लाल पाणपक्ष्यांबद्दल सांगितले. हे पक्षी लांबलचक रांगेत उभे राहून चोचीत मासे कसे पकडतात याचे वर्णन केले. त्याने वाळवंटातील प्राचीन स्फिंक्सबद्दल सांगितले. तसेच त्याने हातात अंबरच्या माळा घेऊन ऊंटांसोबत चालणाऱ्या व्यापाऱ्यांबद्दलही सांगितले.



“पाकोळी मित्रा, तू मला सगळ्या नवलाईच्या गोष्टी सांगितल्यास. पण जगात सगळ्यात नवलाईची गोष्ट आहे लोकांचे दु:ख! दु:खाएवढी गूढ गोष्ट कोणतीच नाही. पाकोळी मित्रा, या शहरावरून उडत जा आणि तुला काय दिसते ते मला सांग,” राजपुत्र म्हणाला.

मग पाकोळी संपूर्ण शहरावरून उडत गेला. त्याने श्रीमंत लोक आपल्या घरी मौजमस्ती करतायत, हे पाहिले. त्याने भिकारी रस्त्यावर भीक मागतायत, हे पाहिले. तो अंधाऱ्या गल्ल्यांतून उडत गेला तेव्हा त्याने भुकेल्या मुलांचे निस्तेज चेहरे पाहिले.



त्याने पुलाखाली दोन लहान मुले उब मिळवण्यासाठी एकमेकांच्या मिठीत झोपलीयत, हे पाहिले.

पाकोळी उडून पुन्हा राजपुत्राकडे आला आणि त्याने शहरात काय पाहिले ते कथन केले.

“माझ्या शरीरावर सोन्याची पानं आहेत. एक-एक पान काढून शहरातल्या गरीबांना वाट. सोनं मिळाल्यावर ते खुश होतील,” राजपुत्र म्हणाला.

हळूहळू राजपुत्राच्या शरीरावरील सर्व सोने संपून गेले. आता राजपुत्र खूप नीरस व निराश दिसू लागला.

गरीबांना सोने मिळाल्यावर त्यांच्या मुलांचे चेहरे फुलले. ते गल्ल्यांमध्ये हसताखेळताना दिसू लागले. “आता आपल्याला भाकरी खायला मिळेल,” ते ओरडू लागले.

मग हिमवर्षाव झाला. भरपूर बर्फ पडले. रस्ते जणू चांदीचे बनवल्यासारखे तेजस्वी आणि चमकदार वाटू लागले. घरांच्या छतांना लटकलेले बर्फाचे स्फटिक खंजीरांसारखे दिसू लागले. लोक फरचे कपडे घालून फिरू लागले. लहान मुले लोकरीच्या टोप्या घालून बर्फावर स्केटिंग करू लागले.

गरीब बिचारा पाकोळी थंडीने गोठून गेला. पण तो राजपुत्राला सोडून गेला नाही. तो राजपुत्रावर प्रेम करू लागला होता. बेकरीवाल्याने दाराबाहेर फेकलेला ब्रेडचा तुकडा पाकोळीने उचलला आणि आपल्या तोंडात टाकला. आपले पंख फडफडवून त्याने स्वत:ला उब देण्याचा प्रयत्न केला.

अखेरीस, त्याला कळून चुकले की तो लवकरच मरणार आहे. त्याच्या अंगात राजपुत्राच्या खांद्यापर्यंत पोहोचण्याचे बळ तेवढे शिल्लक होते.

“निरोप घेतो, राजपुत्रा!” तो पुटपुटला, “काय मी तुझ्या हाताचं चुंबन घेऊ शकतो?”

“तू इजिप्तला चाललायस याचा मला आनंद आहे. तू माझ्यासाठी इथे बराच काळ राहिलास. खरंतर तू माझ्या ओठांचं चुंबन घ्यायला हवंस कारण माझं तुझ्यावर प्रेम आहे,” राजपुत्र म्हणाला.

“मी इजिप्तमध्ये जात नाहिए. मी मृत्यूच्या दारात चाललोय. आणि मृत्यू हा झोपेचा भाऊ आहे, नाही का?” पाकोळी म्हणाला.

त्याने आनंदी राजपुत्राच्या ओठांचे चुंबन घेतले. मग तो राजपुत्राच्या पायाशी निपचित पडून राहिला आणि मेला.

त्याच क्षणी पुतळ्याला आतून भेग पडल्यासारखा आवाज आला. जणू काहीतरी तटून गेले. पुतळ्याच्या आतील शीशाचे हृदय काडकन मोडून त्याचे दोन भाग झाले होते.
हा निश्चितच एक भयानक कठोर दंड होता.



दुसऱ्या दिवशी सकाळी महापौर इतर सदस्यांसोबत चौकात फिरायला आले. स्तंभावर उभा असलेल्या पुतळ्याकडे पाहून ते म्हणाले, "हा आनंदी राजपुत्र किती जीर्ण दिसतोय!"

"हो एकदम जीर्ण दिसतोय," सदस्य एकसुरात म्हणाले. ते नेहमीच महापौरांच्या हो ला हो म्हणत. पुतळा बघण्यासाठी सर्व स्तंभावर गेले.

"तलवारीतून माणिक गळून पडलंय, डोळे गायब झालेयत आणि अंगावर सोन्याची पानंसुद्धा नाहियेत," महापौर म्हणाले, "हा पुतळा आता भिकाऱ्यासारखा दिसतोय."

"हो, पुतळा आता भिकाऱ्यासारखा दिसतोय," सदस्य एकसुरात म्हणाले.

"आणि इथे बघा, एक पक्षी मरून पडलाय," महापौर म्हणाले, "पक्ष्यांना इथे मरायची परवानगी नाही असं घोषणापत्र तयार करा." क्लर्कने या सूचनेची नोंद केली.





म्हणून त्यांनी आनंदी राजपुत्राचा पुतळा खाली काढला. "आता त्याचं सौंदर्य हरपलं. त्याचा काही उपयोग नाही," विद्यापीठाचे कला शाखेचे प्राध्यापक म्हणाले.

त्यांनी पुतळ्याला एका भट्टीत वितळवले. वितळवलेल्या धातुचे काय करायचे, हे ठरवण्यासाठी महापौरांनी एक बैठक बोलावली. "तिथे दुसरा पुतळा उभारुया. हा पुतळा माझा असेल," ते म्हणाले.

"नाही, हा पुतळा माझा असेल," नगरपरिषदेचा प्रत्येक सदस्य म्हणू लागला आणि ते आपापसांत भांडू लागले.

"किती विचित्र गोष्ट आहे!" भट्टीतील कारागीर म्हणाले, "हे मोडलेलं शीशाचं ह्रदय भट्टीत वितळलं नाही. ते फेकून दिलं पाहिजे."

त्यांनी ते ह्रदय भंगारात टाकून दिले. तिथेच मृत पाकोळीचे शरीरसुद्धा पडले होते.

"मला शहरातल्या सर्वात मौल्यवान दोन वस्तू आणून दे," ईश्वराने आपल्या दूताला सांगितले. दूत शीशाचे ह्रदय आणि मृत पाकोळीचे शरीर घेऊन आला.

"तू अतिशय योग्य निवड केलीयस. माझ्या स्वर्गातल्या बागेत हा पाकोळी सतत आनंदाने गात राहील आणि माझ्या सोन्याच्या शहरात आनंदी राजपुत्र माझे गुणगान करत सुखात राहील."



# ऑस्कर वाइल्ड



एकोणिसाव्या शतकात लोकांना परिकथांमध्ये नव्याने रस वाटू लागला. त्यामुळे मुलांसाठी पुस्तके लिहिण्याच्या व प्रकाशित करण्याच्या व्यवसायाला गती आली. तोपर्यंत मुलांसाठी लिहिण्यात येणारे बहुतेक साहित्य नीतिकथा आणि धार्मिक स्वरुपाचे होते. पण 1823 साली ब्रदर्स ग्रिम यांच्या कथांचे अनुवाद प्रकाशित झाल्यावर हे चित्र बदलले. अचानक परिकथांचे पेव फुटले आणि मुलांना मनोरंजनाचा नवा खजिना मिळाला. यामुळे नव्या दमाच्या लेखक व कविंनाही लिखाणासाठी स्फूर्ती मिळाली.

ऑस्कर वाइल्डचा जन्म 16 ऑक्टोबर 1854 रोजी आयर्लंडमधील डब्लिन शहरात विल्यम आणि स्पेरेंझा वाइल्ड या दांपत्याघरी झाला. त्याकाळात त्याचे आईवडीलही परीकथेच्या प्रवाहात ओढले गेले आणि त्यांनी ऑस्कर व त्याच्या भावासाठी आयरीश लोककथांचा संग्रह केला.

खरंतर वाइल्डने बालपणीच्या आठवणींपेक्षा स्वत:च्या मुलांसाठी परीकथांमध्ये रस घेतला. त्यांचा मुलगा सिरील आईच्या पोटात असतानाच त्याने “आनंदी राजपुत्र” ही कथा लिहिली. या कथेत त्याने समाजातील विषमता आणि गरीबांचे दु:ख विशद केले.

30 नोव्हेंबर 1900 रोजी फ्रान्समधील पॅरिस शहरात ऑस्कर वाइल्डचे निधन झाले.